**अ‍ॅड. श्री. राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**
**क्रिमिनल रिट पिटीशन क्र.३८०६/२०२१ या याचिकेच्या न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०२२२/प्र.क्र.३४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ०६ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :** (१) विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्र. ०८/SPP/२०२२/- A◦ Branch, दि. ०८.०३.२०२२.
(२) पोलीस महासंचालक कार्यालय यांचे पत्र जा.क्र.पोमसं/१४/६६/वि.स.-पुणे शहर/ १५२/ २०२१, दि.१७.०२.२०२२.
(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
(४) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

.

**शासन निर्णय:-**

क्रिमिनल रिट पिटीशन क्र.३८०६/२०२१ या याचिकेच्या मा.उच्च न्यायालय या न्यायालयामध्ये न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष समुपदेशी म्हणून अ‍ॅड. श्री. राजा ठाकरे यांची संदर्भ क्र.१ अन्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे. अ‍ॅड.ठाकरे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. उच्च न्यायालय, मुंबई.**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.२,००,०००/- (रुपये दोन लाख फक्त)
ब) विचारविनिमय फी (प्रतितास/तासाचा भाग) - रु.४०,०००/- (रुपये चाळीस हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अ‍ॅड.श्री. राजा ठाकरे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस आयुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०९), जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल- (२०५५ ०१६८)-२८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

**४.** प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१६१७४५८९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARESHWAR NAMDEO SAHANE

Digitally signed by HARESHWAR NAMDEO SAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c666d6034b5e98c5d1bd37af6d50b3277469ad6a9c55fe42051469194c47c2d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A0C4666E299E972427F9DABEDD7FF52FB5313B50C0D9A59C64EC908916651EC1, cn=HARESHWAR NAMDEO SAHANE
Date: 2024.08.07 16:32:27 +05'30'

**( हरेश्वर सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, पुणे शहर.
३. अपर पोलीस आयुक्त, गुन्हे, पुणे शहर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
६. ॲड.श्री.राजा ठाकरे,३०१, मारुती मॅन्शन,१७, रघुनाथ दादाजी मार्ग, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
७. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती पोल-१०.